वर्कप्लॅन अंतर्गत कृषि यांत्रिकीकरणाची
१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना
सन २०११ - २०१२ मध्ये राबविण्यासाठी
<u>प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.</u>

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :-कृयांयो - १६११ / प्र.क्र. १५९ /४अे,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२,**
**दिनांक: - ३० जून, २०११**

**संदर्भ** :- १ ) शासन निर्णय, क्रमांक कृयांयो -१६१० /प्र.क्र.१८६/४अे, दि. २८ जून, २०१०, २६ जुलै, २०१० व २५ जानेवारी, २०११
२) केंद्र शासनाचे पत्र क्र. ६-६ /२०११- एम.एम, दिनांक ०६ मे, २०११
३) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. जा.क्र./कृउसं-७ /कृ.या./शा.नि./८२७/११, दि. १४/६/२०११
४) कृषि व पदुम विभाग, कार्यासन २-अे ची दि. २७/६/२०११ ची टिप्पणी

**प्रस्तावना :-**

राज्यातील अल्प व अत्यल्प भूधारक शेतकऱ्यांना कृषि यांत्रिकीकरण करण्यास प्रोत्साहन देण्यासाठी सन १९८५-८६ पासून १००% केंद्र पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजना राज्यात राबविण्यात येत आहे.

केंद्रीय कृषि मंत्रालयाच्या संदर्भाधीन दिनांक ६/५/२०११ च्या पत्रान्वये सन २०११-१२ मध्ये वर्कप्लॅनमधील योजनांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. या योजनांमध्ये १००% केंद्र पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण या योजनेचा समावेश आहे. सदर योजना राज्यात राबविण्यासाठी केंद्र शासनाने रु. १६००.०० लाखाच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता दिली आहे. त्याचप्रमाणे रु. १२००.०० लाख निधीस वित्तीय मान्यता दिली आहे. केंद्र शासनाची मान्यता विचारात घेऊन, १०० टक्के केंद्र पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजना राज्यात सन २०११ - १२ मध्ये राबविण्यासाठी रु. १६००.०० लाख ( रु. सोळा कोटी ) निधीस प्रशासकीय व रु. १२००.०० लाख ( रु. बारा कोटी ) निधीस वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्रीय कृषि मंत्रालयाच्या संदर्भाधीन दिनांक ०६/५/२०११ च्या पत्रान्वये सन २०११-१२ मध्ये वर्कप्लॅनमधील योजनांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. या योजनांमध्ये १००% केंद्र पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण या योजनेचा समावेश आहे. केंद्र शासनाची मान्यता विचारात घेऊन, १०० टक्के केंद्र पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजना राज्यात सन २०११ - १२ मध्ये राबविण्यासाठी रु. १६००.०० लाख ( रु. सोळा कोटी ) निधीस प्रशासकीय व रु. १२००.०० लाख ( रु. बारा कोटी ) निधीस शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. या योजनेसाठी मंजूर केलेला रु. १२००.०० लाख निधी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०११-१२ च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

**लेखाशिर्ष :-**
**मागणी क्रमांक डी -३,**
**२४०१-पीक संवर्धन**
**११३- कृषि अभियांत्रिकी**
**(००) (०८ ) कृषि यांत्रिकीकरणास प्रोत्साहन**
**(२४०१ २५१३ ) ( १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना )**
**३३ - अर्थसहाय्य**

३.	केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना, अटी व शर्तीनुसार सन २०११-१२ मध्ये केंद्र पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण कार्यक्रम राबविण्यात यावा.

केंद्र शासनाने सन २०११ -१२ साठी मंजूर केलेली आर्थिक व भौतिक लक्षे खालीलप्रमाणे आहेत :-

| अ.क्र. | कार्यक्रम | परिमाण | भौतिक लक्ष | आर्थिक लक्ष ( रू. लाखात ) |
|---|---|---|---|---|
| १ | **कृषि अवजारे / उपकरणे यांचा शेतकऱ्यांना २५ ते ५० टक्के अनुदानावर पुरवठा ( केंद्र व राज्य शासनाने मंजूर केलेली यंत्रे )** | **संख्या** | **१३६७५** | **१६००.००** |

४.	या योजनेची भौतिक व आर्थिक उद्दीष्टे निश्चित करण्यास संचालक (विस्तार व प्रशिक्षण) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. या कार्यक्रमाच्या उद्दीष्टपूर्तीसाठी संचालक (विस्तार व प्रशिक्षण) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे, यांनी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन उद्दीष्ट निहाय सविस्तर मार्गदर्शक सूचना सर्व क्षेत्रिय अधिकाऱ्यांना निर्गमित कराव्यात. या मार्गदर्शक सूचना निर्गमित करतेवेळी पुढील प्रमुख बाबी अंतर्भूत करण्याची दक्षता घेण्यात यावी व केंद्र शासनाच्या सुधारित मार्गदर्शक सूचनांमध्ये नमूद केलेल्या कृषि अवजारे व यंत्राचा पुरवठा निश्चित केलेल्या अनुदानावर करण्यात यावा.

अ)	या योजनेतंर्गत प्रति शेतकरी / बाब अनुदानाची कमाल मर्यादा योजनेच्या निकषाप्रमाणे राहील.

ब)	लाभार्थी निवडतांना लहान व सिमांतक अनुसूचित जाती / जमाती, भटक्या विमुक्त जाती / जमाती संवर्गातील लाभार्थी यांना प्राधान्य देण्यात यावे.

क)	मंजूर निधीपैकी २२.५० टक्के निधी अनुसूचित जाती / जमातीसाठी व ३० टक्के निधी महिलांसाठी खर्च करण्यात यावा व याबाबतच्या नोंदी स्वतंत्रपणे ठेवाव्यात.

ड)	कृषि यांत्रिकीकरणावर अधिक भर देण्यासाठी कृषि चिकित्सालयाचे स्तरावर सुधारित कृषि अवजारांचा संच उपलब्ध करुन देण्यात यावा व त्याद्वारे अवजारे वापराची प्रात्यक्षिके आयोजित करण्यात यावीत. तसेच ही अवजारे कृषि चिकित्सालयाच्या कार्यक्षेत्रातील शेतकऱ्यांना भाडे तत्वावर पुरविण्यात यावीत.

इ)	या योजने अंतर्गत लाभार्थ्यांना द्यावयाची अवजारे महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ, महाराष्ट्र लघु उद्योग विकास महामंडळ आणि महाराष्ट्र राज्य पणन महासंघ यांचेमार्फत खरेदी करण्यात यावीत.

ई)	**या योजनेचे मुल्यमापन त्रयस्थ यंत्रणेकडून ( Third Party Evalutation ) करून घ्यावे.**

उ)	या योजने अंतर्गत घेतलेल्या कार्यक्रमाची व लाभार्थींची यादी तालुका कार्यालये / पंचायत समिती / जिल्हाधिकारी कार्यालयात लावण्यात यावीत, तसेच इंटरनेटवर देखिल देण्यात यावी.

ऊ)	प्रत्येक जिल्हयाचा यथार्थदर्शी व विस्तार आराखडा (S.R.E.P.) मध्ये या योजनेचा अंतर्भाव गरजेनुरुप ठेवण्यात यावा.

**५.**	या कार्यक्रमासाठी मंजूर केलेला निधी खर्च करण्यास **संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे** यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.तसेच मंजूर निधीचे जिल्हा निहाय वितरण करण्यास **संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे** यांना प्राधिकृत करण्यात येत असून या योजनेचा खर्च मासिक कॅश फ्लोच्या मर्यादेत राहिल याची दक्षता घेण्याची व संगणकीय अर्थसंकल्पिय प्रणालीद्वारे वितरित करण्याची जबाबदारी **संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे** यांची राहिल .

६.	केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे या योजनेचा मासिक आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल प्रत्येक महिन्याला ५ तारखेपर्यत विहित मुदतीत केंद्र शासनाला तसेच राज्य शासनाला सादर होईल याची दक्षता घेण्यात यावी.

८.	सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ९८ / ११ / व्यय - १ दि.२३/६/२०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

९.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाची www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक **२०११०७०४१५२८४९००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( वि.मा. बिवलकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे.( ५ प्रती)
संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,पुणे.(१० प्रती)
जिल्हाधिकारी (सर्व)
अध्यक्ष, सर्व जिल्हा परिषदा
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
सर्व संचालक/ सहसंचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ मर्या.राजन हाऊस,प्रभादेवी, मुंबई-२५
विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
सर्व मुख्य वित्त व लेखाधिकारी (जिल्हापरिषद)
सर्व कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद
महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर (लेखा परिक्षा) /(लेखा व अनुज्ञेयता)
सर्व कोषागार अधिकारी
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पणन महासंघ, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ,मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय कृषि व ग्रामीण विकास बँक, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक,भूविकास बँक, मुंबई
माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
नियोजन विभाग/ वित्त विभाग/ग्राम विकास विभागमंत्रालय, मुंबई-३२
सर्व सह सचिव/ उप सचिव/अवर सचिव/ कक्ष अधिकारी (कृषि), कृषि व पदुम विभाग
निवडनस्ती